**पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता नोडल अधिकारी नेमणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

**शासन आदेश क्रमांक :- बीजीटी-२०२५/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १५ मे, २०२५

**वाचा :-**१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व खनिकर्म विभाग क्र.आयडीसी-२०२४/प्र.क्र.१११/उद्योग-२, दि.१२.०८.२०२४

२) मा. मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र दि.७.३.२०२५

**प्रस्तावना :-**

उद्योग, ऊर्जा व कामगार व खनिकर्म विभागाच्या वाचा क्र.१ दि.१२.८.२०२४ च्या शासन निर्णयान्वये पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता समित्यांची स्थापना करण्याबाबत.. एकत्रित आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. यास अनुसरुन पीएम गतीशक्ती पोर्टलबाबत मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि.५.३.२०२५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. दि.५.३.२०२५ रोजीच्या बैठकीच्या अनुषंगाने मुख्य सचिव कार्यालयाकडून वाचा क्र.२ येथील दि.७.३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये बैठकीतील चर्चेनुसार सूचना निर्गमित केल्या आहेत. या सूचनानुसार प्रशासकीय विभागांनी शक्यतो पायाभूत सुविधा योजनांशी संबंधित सह सचिव / उप सचिव यांची पीएम गतीशक्ती पोर्टल करिता नोडल अधिकारी नेमणेबाबत निदेश देण्यात आले आहे. त्यानुसार पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचे नोडल अधिकारी नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

पीएम गतीशक्ती नॅशनल मास्टर प्लॅन या केंद्र शासनाच्या महत्वाकांक्षी उपक्रमाकरीता विभागाच्या पायाभूत सुविधा योजनांशी संबंधित श्री. सो. ना. बागुल, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना "नोडल अधिकारी" म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५१५१४५७२८९१२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.05.15 14:58:26 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सह / उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सह सचिव, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
४) श्री. सो. ना. बागुल, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सर्व सह / उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग